**चिचपल्ली, ता. जि. चंद्रपूर येथे बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्राचे बांधकाम करण्याकरीता खाजगी वास्तुशास्त्रज्ञाद्वारे सादर केलेले आराखडे व नकाशे मंजूरीसाठी समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. इएसटी-२०१३/प्र.क्र.६४/भाग-४/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २९ डिसेंबर, २०१६

**संदर्भ :-** मुख्य वनसंरक्षक, चंद्रपूर वनवृत्त, चंद्रपूर यांचे क्र. कक्ष ६/अभि/२०१६-१७/१४४२, दिनांक १९.१२.२०१६ चे पत्र.

**शासन निर्णय :-**

चिचपल्ली, ता. जि. चंद्रपूर येथे स्थापन करण्यात आलेले बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र जागतीक दर्जाचे प्रशिक्षण केंद्र होणे अभिप्रेत असल्याचे राज्य बांबू समितीच्या चर्चेमध्ये व्यक्त करण्यात आले. त्यामुळे निव्वळ सिमेंट इमातीचा समावेश होणे उचित नाही. त्याकरीता अशा प्रकारची कामे ज्या संस्थेकडून / बांबू तज्ञाकडून करण्यात आलेली आहेत, त्यांचेकडून प्रस्ताव मागविण्याचे सूचित करण्यात आले. यासंदर्भात वेळावेळी शासन स्तरावर चर्चा करण्यात आली. चिचपल्ली येथील बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्राच्या बांधकामाच्या प्रकल्पाचे सादरीकरणही करण्यात आले. सादरीकरणास तात्वीक मान्यता देवून अंशता निवासी इमारती व पाण्याच्या टाकीचे (look) दृष्य बांबूसारखे ठेवण्याबाबत सूचित केले. सदर बांधकाम उच्च दर्जाचे होणे आवश्यक आहे. बांबूचा उपयोग करून होत असलेले बांधकाम एकमेव (Unique) असल्यामुळे संबंधित विभागाच्या अधिकाऱ्यांचा समावेश करून समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याकरीता, खालील प्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर | - | अध्यक्ष |
| २. उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर | - | सदस्य |
| ३. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर | - | सदस्य |
| ४. मुख्य वनसंरक्षक, चंद्रपूर | - | सदस्य |
| ५. संचालक, बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली | - | सदस्य |
| ६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.२ चंद्रपूर | - | सदस्य सचिव |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२३०१२२२२९८११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijaykumar Vasudeo Patil

Digitally signed by Vijaykumar Vasudeo Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b1fa488256513b9e2a5b0085040486cc2b67ff77bb697c031c8d3ba4aaf6e350, cn=Vijaykumar Vasudeo Patil
Date: 2016.12.30 12:25:13 +05'30'

( वि.वा.पाटील )
कार्यासन अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (हेड ऑफ फॉरेस्ट फोर्स), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर
६. उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर
७. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर.
८. मुख्य वनसंरक्षक, चंद्रपूर
९. संचालक, बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली
१०.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.२ चंद्रपूर
११.सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.
१२.वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
१३.नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
१४.फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५.कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती).